**केंद्र पुरस्कृत योजना सन २०१८-१९**
**"हत्ती प्रकल्प" योजनेअंतर्गत कोल्हापूर वनवृत्तात हत्तीकडून होणाऱ्या नुकसानीची उपाययोजना करीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०९.१८/प्र.क्र.३६७/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- २७.०९.२०१८.

**वाचा :-**

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक :- ०२.०४.२०१८.
२. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक एफ-नं. १-१३/२०१५-पीई, दिनांक ११.०९.२०१८.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/सी/यो/ प्र.क्र.१९ /(१८-१९)/१०९८/१८-१९, दिनांक २४.०९.२०१८.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-वजी/२२(६)/यो/प्र.क्र.४/२२७०, दिनांक १२१.०९.२०१८.

**प्रस्तावना :-**

"हत्ती प्रकल्प" योजनांतर्गत पूर्वी केंद्र शासनाकडून २४०६ २३५७ या लेखाशिर्षातंर्गत १००% केंद्र अनुदान उपलब्ध करुन दिले जात होते. तथापि सन २०१६-१७ मध्ये सदर योजनेच्या हिस्सा पध्दतीमध्ये बदल करण्यात आल्याचे केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल मंत्रायल, नवी दिल्ली यांनी सूचविले. त्या नुसार सन २०१६-१७ मध्ये हत्ती प्रकल्प या योजनेकरीता केंद्र हिस्सा ६०% अंतर्गत २४०६ २३५७ हे लेखाशिर्ष तर त्याच अनुरुप राज्य हिस्सा ४०% अंतर्गत २४०६ A१११ या लेखाशिर्षाचा वापर करण्यात येत आहे.

२. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना-"हत्ती प्रकल्प" योजनेअंतर्गत कोल्हापूर वनवृत्तात हत्तीकडून होणाऱ्या नुकसानीची उपययोजना करीता केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांनी संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये रु. ७७.५६ लक्षच्या कार्यबाबींना मंजूरी प्रदान केली असून केंद्र हिस्सा ६०% अंतर्गत प्रथम हप्ता

म्हणून रु. ३७.२२ लक्ष निधी वितरीत केला आहे. त्या अनुरुप राज्य हिस्सा ४०% अंतर्गत २४.८२ लक्ष निधी वितरीत करणे अपेक्षित आहे.

**<u>शासन निर्णय</u>**

सबब आता सदर शासन निर्णयान्वये वर नमूद केल्याप्रमाणे **रु. ६२.०४ लक्ष** संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या कार्यबाबींवर खर्च करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) प्रस्तावित खर्चापैकी लेखाशिर्ष **I)** केंद्र हिस्सा ६०% अंतर्गत आवर्ती + अनावर्ती बाबींसाठी रु. ३७.२२ लक्ष लेखाशिर्ष क्रमांक :- २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(१४) हत्ती प्रकल्प (६० % केंद्रीय अनुदान) (२४०६ २३५७) **II)** त्या अनुरुप राज्य शासनाचा राज्य हिस्सा ४० % करीता रु. २४.८२ लक्ष लेखाशिर्ष कमांक :- २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२२) हत्ती प्रकल्प (४० % राज्य हिस्सा) (२४०६ ए१११) च्या सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

आ) मान्यता दिलेल्या खर्चाच्या तपशीलवार बाबी केंद्र शासनाने उपरोक्त संदर्भीय पत्रांमध्ये नमूद केल्या आहेत. सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

इ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

ई) प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. करुन खरेदी करण्यात यावी.

उ) प्रस्तुत प्रकरणी केंद्र शासनाचा हिस्सा व राज्य शासनाचा हिस्सा मधील अंतर्भूत १० % Flexi Fund **बाबत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करावी**.

ऊ) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२७१६२६५३७५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2018.09.27 16:28:46 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर.
५) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयतस) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती